# मुद्गल पुराण

[ गणेशकथामृत ]

## श्रीगणेशप्रार्थना

श्रीगणेशाय नमः सर्व सिद्धींचा दाता, बुद्धीचा प्रकाशक व योग्यांच्या हृदयांत राहणारा जो श्रीभगवान् गणेश त्याचें एकचित्तानें मी ध्यान करतों या देवानें 'ब्रह्म' नांवानें ओळखल्या जाणाऱ्या सर्व वस्तूंस आत्मवश केले आहे, तसेच सर्व देव व सर्व तत्त्वें यांसहीं स्ववश केलें आहे. स्वतः निर्गुण असतांही भक्तांच्या संरक्षणासाठीं व कल्याणार्थ या देवानें अनेक अवतार धारण केले आहेत. असा हा नरकुंजररूपी जो श्रीगणपती, त्याला मी नमस्कार करतो तसेंच, शिव, विष्णु इत्यादि देव, योगी, महर्षी यांस ही पुराणज्ञानसिद्धि व्हावी एतदर्थ नमस्कार करतो.

## नैमिषारण्यांत सूताचें आगमन, पुराणकथन व मुद्गलपुराणप्रवेश

पूर्वकल्पांत एकदां शौनकादि ऋषी नैमिषारण्यांत तपश्चर्या करीत असतां तेथें एका पुराणज्ञ व महाविचक्षण सूताचे आगमन झाले. त्यानें तेथील ब्राह्मणांचे पवित्र आश्रम, त्यांची दैदीप्यमान कांति व त्यांचे

ब्रह्मतेज पाहिलें व नम्र होऊन त्यानें सर्व मुनींस साष्टांग प्रणिपात केले, व त्यांचे पुष्कळसे धन्यवाद गाइले. नंतर शौनकप्रमुख ऋषींनी सूताला शुभासनावर बसवून त्यास विनविले कीं, 'व्याससंनिध राहून तू जी कलिमलापह पुराणें ऐकली आहेस ती आह्मांस सांग ' सूताने या विनंतीस मान देऊन अनेक पुराणें सांगितली. ह्या धर्मयुत पुराणांत अनेक कथा, आख्यानें, सहजगत्या येऊन गेली; त्यायोगें सर्व ऋषींस समाधान वाटलें, आनंद झाला, हें खरें; पण अनेक पुराणांत असणारीं नानामतें ऐकून त्यांच्या मनाचा घोटाळा झाला. शिव श्रेष्ठ की विष्णु श्रेष्ठ, ज्ञान श्रेष्ठ की कर्म श्रेष्ठ, अन्न ब्रह्म की वायु ब्रह्म इत्यादि सर्व घोटाळा होऊन ऋषींनी पुनः सूताची प्रार्थना केली की, 'वेदांस मान्य, सर्व संशयांचा नाश करणारा एकच मार्ग सांग.' ही प्रार्थना मान्य करून सूतानें श्रुतिस्मृतींचे सार असें मुद्गलप्रणीत प्रवचन सांगण्यास आरंभ केला. 'मुनिहो ! दक्षप्रजापतींच्या यज्ञाचा विध्वंस झाल्यानंतर तेथें मुद्गल मुनि आले व दक्षकृत पूजेचा स्वीकार करून ते म्हणाले :–

**शौनक :**– कृपा करा आणि आम्हाला दक्षानें यज्ञ कां केला, त्याचा विध्वंस कां व कोणी केला इत्यादि सर्व वर्तमान विस्तारानें सांगा. तसेच मुद्गल ऋषि कोण हे सांगा.

## दक्षयज्ञ व त्याचें प्रमथन

**सूत :**– मुनिहो ! दक्ष हा ब्रह्मदेवाचा श्रेष्ठ मुलगा तो लवकरच प्रजापतित्व पावला; पण त्या बरोबरच तो उन्मत्तही झाला. एकदा कैलास पर्वतावर विष्णुप्रमुख देव, गंधर्व, सिद्ध, नाग, यक्ष हे सर्व शंकरदर्शनासाठी गेले. शंकरांनी सर्वांचा यथायोग्य सत्कार

करून पूजा केली व कुशल प्रश्न विचारण्यास आरंभ करणार इतक्यात नारदादि ऋषींनीं शंकरस्तवन करण्यास आरंभ केला. अप्सरा नाचू लागल्या, गंधर्व गाऊं लागले आणि सर्व आनंदाने डोलूं लागले. याप्रमाणे सभा रंगात आली असता तेथें शंकरश्वशुर दक्षप्रजापति आले. त्यांचाही सत्कार शंकरांनी केला, पण त्यास नमस्कार केला नाही. तेव्हा उन्मत्त दक्षास संताप येऊन त्याने भरसभेत शंकरास वाटतील तसल्या गलिच्छ शिव्या दिल्या. हा प्रकार पाहून व शंकर स्वस्थ बसले आहेत हे पाहून तामसो नंदिकेश्वराने शंकरमहिमा गाइला व दक्षास शाप दिला की, 'तुला मेंढीचे तोंड उत्पन्न होईल.' दक्षानेही त्याला प्रतिशाप दिला की, 'सर्व शंकरभक्त अज्ञानी, दुर्वृत्त व पाखंडी होतील.' नंतर ब्रह्मदेवाने दक्षाची निर्भर्त्सना केली. तेव्हा दक्ष क्रोधवश होत्साता स्वगृहाप्रत जाता झाला, सर्व देवही खिन्नचित्त झाले व सर्व सभेचा विरस झाला. दक्ष घरी जळफळतच गेला व शंकराची मानहानि कशी करावी, हा विचार करू लागला. त्याच्या सुदैवाने तेथे नारदाची स्वारी आली. नारदाचा दक्षाने योग्य सत्कार केला खरा; पण मनांत चिंता होती, ती त्याला झांकता आली नाही. अर्थातच नारदापाशी त्याने आपले गुह्य सांगितले व 'उपाय सांगा' म्हणून प्रार्थना केली. नारदांनी सांगितले की, 'तूं 'बृहस्पति' यज्ञ कर व शंकराला यज्ञभाग देऊं नको. आता तूं भाग दिला नाहीस म्हणजे पुढेही कोणी देणार नाही आणि असे त्याचे महत्व कमी होईल.' दक्षाला ही युक्ति मानवली. त्याने यज्ञाचा संकल्प केला व शंकराशिवाय सर्व देवांस, कश्यपादि ब्राह्मणांस, गंधर्वादि सर्व जातींस, 'सहकुटुंब सहपरिवार यावे, अशी निमंत्रणे केली. बोलाविलेली सर्व मंडळी आली. पाहुण्यांत

गणपति नाही व शंकर नाही असे होते ! गणेशविस्मरण तर सर्वांसच झाले. असो; शिवभक्त दधीचि आदि ऋषींनी शंकर नाही असे पाहून दक्षाची कानउघाडणी केली. पण त्या उन्मत्ताला ऐकूच आले नाही. 'यज्ञाचे लक्षण चांगले दिसत नाही' असे म्हणून कित्येक ऋषी उठून चालते झाले. त्यांनी जातांना विष्णूस व इतर देवांस शाप दिले. असो. ही मंडळी गेल्यावर जिकडे तिकडे स्वस्थता होऊन यज्ञकर्मास सुरवात झाली व सर्व मंडळीस आनंद झाला. दक्षाच्या आनंदाला तर पारावरच नव्हता. इकडे नारद कैलासास गेले. उभयतांस नमस्कार करून नारदांनी शिवपत्नी जी सती तिला सहज विचारल्यासारखे केले की, 'तुझ्या पित्याच्या येथे येवढा यज्ञ चालला असून तू कां गेली नाहीस? तुझ्या बाकीच्या सर्व बहिणी तेथे आहेत. माहेरी जाण्याला बोलावणे काय करायचे आहे?' इतकें बोलून कलहप्रिय नारद गेले मात्र, तो सतीने 'यज्ञप्रेक्षणास चला' असा शंकरास आग्रह केला. पण ते येण्यास प्रतिकूल आहेत असे पाहून व शंकर 'जाऊ नको, तुझा अपमान होईल, दुष्टाच्या येथे आपण जाऊ नये' असे सांगत असतानाही ते न ऐकून सती विमानात बसली व पितृगृही जाऊन उतरली. दक्षाने तिचे स्वागत चांगले केले व 'आलीस, यज्ञाला शोभा आली.' असे म्हणाला तेव्हा 'माझ्या पतीस का पाचारण नाही' असे सतीने विचारतांक्षणी दक्षाने शंकरनिंदा करण्याला आरंभ केला; तेव्हां ही निंदा सहन करता येईना म्हणून सतीने योगाग्नि पेटवून आपल्या दक्षप्राप्त देहाचा नाश केला. हीच पुढे पार्वती झाली. इकडे कैलासावर सर्व मंडळी खिन्नच होती. अपशकून पुष्कळ झाले काय वार्ता तीही कळेना, इतक्यात नारदमहाराज आले आणि त्यांनी सतीदहनाचा वृत्तांत सांगितला

तो ऐकून शंकरास परम दुःख झाले व 'आपण विघ्नहर्ता जो गणेश त्याला विसरलो' हे ध्यानांत येऊन त्यास पश्चात्तापही झाला. लागलीच त्यांनी गणपतीचे सगुण ध्यान करून भक्तीने स्तुती केली श्रीगणपति सगुणरूपाने प्रकट होऊन 'सती पार्वतीरूपाने तुला मिळेल' असा आशीर्वाद दिला व अंतर्धान पावले. नंतर शंकरास दक्षाच्या उन्मत्तपणाची आठवण होऊन तो क्रोधसंतप्त झाला. त्याने रागाने जटा आपटल्या तो वीरभद्राचा अवतार झाला. 'काय आज्ञा' म्हणून हात जोडून विचारल्यावर वीरभद्रास शंकरानी 'दक्षयज्ञाचा विध्वंस कर' अशी आज्ञा केली. आज्ञेचा अवकाश; सर्व शिवगण दक्षयज्ञमंडपात गेले व यज्ञाचा विध्वंस करून ब्राह्मणांस भेडसावून, इंद्रादि देवास धुडावून, ऋषिपत्न्यांची निंदा करून त्यांनी सर्वत्र हलकल्लोळ उडवून दिला. इतक्यात शंकरही तेथे आले. रुद्रांचे व देवांचे व शंकराचे व विष्णूचे महाघोर युद्ध झाले. प्रत्येक देवास यज्ञाला आल्याचे प्रायश्चित्त मिळाले. वीरभद्राने दक्षाला खाली पाडून त्याचे शिर तोडले व ते यज्ञाग्नींत घालून जाळून टाकिले. इतक्यात आकाशवाणी होऊन शंकरविष्णूचे युद्ध थांबले. ब्रह्मदेव येऊन त्यांनी थावराथावर केली व शंकराकरवी ज्यांचा म्हणून काही घात झाला होता, तो नाहीसा केला सर्वांनी गणपतीची स्तुति केली. ब्रह्मदेवाच्या प्रार्थना-मंत्राला यश आले. शंकराच्या आज्ञेवरुन वीरभद्राने दक्षाच्या धडाला अजाशिर चिकटविले, व त्याचा पुनर्जन्म केला, दक्षानेही पश्चात्ताप पुरःसर शंकराची क्षमा मागितली. शंकरानीही त्यास वर दिला की, 'माझ्या देवालयांत 'अजा' सारखा तुझे स्मरण करून जो ध्वनि काढील तोही सुख पावेल.' असो. यानंतर सर्व देव स्वगृही गेले. पण आपला

यज्ञ मोडला, विघ्नपरंपरा उत्पन्न झाली, याचे दुःख दक्षाच्या अंतःकरणात राहिले होते. त्याने मुद्गल ऋषीला हे दुःख सांगून दुःखप्रशमनाचा उपाय विचारला होता, तोच संवाद आता मी सारूपाने सांगतो.

## दक्ष मुद्गलसंवाद–सृष्टीची उत्पत्ति

मुद्गल :- दक्षा ! ब्रह्मादि देवानी संपूजित, ज्येष्ठराज, विनायक स्वानंदवासी, विघ्नहर्ता, ज्ञानदाता चिंतामणि, सर्व सत्ताधीश जो भगवान् गणपति, त्याला शरण जा. तुझी सर्व विघ्ने नष्ट होतील; तुझ्या चिंतेचा क्षय होईल. प्रत्यक्ष शंकरही त्याचे रात्रंदिवस ध्यान करतात. तो मायामय असून मायातीत आहे; तोच विश्वकर्ता, विश्वभर्ता व विश्वहर्ता आहे, तो सर्वाधार, सर्वपुरुषार्थसाधक आहे. त्याच्याच आधाराने व आश्रयाने पुरुष व प्रकृति जगत्व्यवहाराचे कार्य करतात. पुरुषप्रकृतिसंयोगाने महत्तत्त्व उत्पन्न झाले. मग अहंकार, (सात्विक, राजस व तामस,) तामसी अहंकारापासून शब्द, शब्दापासून आकाशादि, स्व-स्वगुणांसह पंचमहाभूते, राजसी अहंकारापासून पंचकर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रिये, पंचप्राण, व सात्विकी अहंकारापासू पंचज्ञानद्रियांचे व पंचकर्मेंद्रियांचे मिळून दहा देव झाले. या सर्वा गणपतिप्रसादाने सृष्टिकर्तृत्व सामर्थ्य आलें. मग सर्व तत्वे एक होउ एक अंडे तयार झाले. त्यात पाणी व परमात्मा होते. अंडे फुटल्य एकच देव त्रिधा झाला. हेच ब्रह्मा, विष्णु, महेश होत. य गणेशस्तुति केली व वर संपादून सृष्टिरचना केली. दक्षा! गणेशाची ज्ञानपूर्वक भक्ति केली असता येथे सौभाग्य वाढून स्वानंदसाम्राज्यात जाता येते. ह्या गणेशापासून वरप्राप्ति करून घे

गुणेशनामक हिरण्यगर्भाने वेद श्वासरूपाने उध्दृत केले. याप्रमाणे अष्टमूर्ति प्रकृतीची व वेदांची उत्पत्ति झाली. नंतर आठ आवरणांनी युक्त असे अंडे झाले व एक पुरुष झाला. पृथ्वीचे, आपाचे, तेजाचे, वायूचे, आकाशाचे, अहंकाराचे, महताचे व मायेचे अशी ही आठ आवरणे होत. ही अंड्याची आवरणे (कवचे) होत. या आठ आवरणांचे, कडे विराट् पुरुषाभोवती होते. स्थावर व जंगम, ह्मणजे सर्व चराचर भूते त्याच्या देहामध्ये होती. त्याच्या कमरेपर्यंत सात पाताळे व कपाळापर्यंत भूर्भुवादि लोक होते. त्याला अनंत इंद्रिये व अनंत अवयव होते. तो सर्वव्यापी, अमर व स्वप्रकाश होता. त्याच्या आंत हिरण्यगर्भ व त्याच्याही आंत ईश्वर व त्याच्याही अंतर्यामी आत्मरूप होते. असो. या विराटाने हजार वर्षे श्रीगणेशाची भक्तिपूर्वक तपश्चर्या केली, व साक्षात्कार झाल्यावर प्रसाद मागितला की, 'मला अखंड भक्ति असावी, ऐश्वर्य असावे व सृष्टिविरचनेचे सामर्थ्य असावे.' 'तथास्तु' ह्मणून श्रीगजानन महाराज अंतर्धान पावले. हा एका ब्रह्मांडाचा विचार झाला. अशी अनंत ब्रह्मांडे निर्माण होऊन श्रीगणेशकृपेने त्यांची व्यवस्था अनंत विराट पुरुष करीत आहेत. असो. या विराटापासूनच ब्रह्मा, विष्णु, महेश, सूर्य व शक्ति ह्या देवता उत्पन्न झाल्या. तपश्चर्या करून त्यांनी यच्चयावत वस्तूंचे ज्ञान संपादन केले. श्रीगणपतीने वरप्रदान देऊन रजोगुणांकित ब्रह्मदेवाला सृष्टिकर्तुत्वाचे; सत्वगुणांकित विष्णूला सृष्टिपालनाचे, तमोगुणांकित शंकराला सृष्टिसंहाराचे, कर्मचालक व अहंभावजन्य सूर्याला सर्व प्रकाशकाचे व त्रिदेहापासून उत्पन्न झालेल्या शक्तिला जगन्मोहनाचे अशी कामे वाटून दिली. प्रत्येकास अनुक्रमे सत्यलोक, वैकुंठ, कैलास

सौरलोक व शक्तिलोक, अशी राहण्यास स्थानें दिली व हंस, गरुड, वृषभ, अश्वरथ व सिंह अशी वाहने देऊन श्रीगजानन अंतर्धान पावले.

**शौनक :** सूता ! इतर व्यर्थ गोष्टी ऐकण्यापेक्षा तूं जें गणेश-चरित्र आम्हांस सांगत आहेस तें अति जास्त मधुर व पुण्यात्मक आहे. म्हणून आम्हास गणेशकथा सांग; पण अगोदर या देवांनी काय काय केलें तें सांग.

**सूत :–** सर्वांच्या अगोदर ज्याचे पूजन होतें, असा तो गणराज 'ज्येष्ठराज' या नावाने प्रसिद्ध आहे. त्याची भक्ति तुम्हांला लागली फार उत्तम झाले. असो, प्रथम या देवतापंचकाने काय काय केलें तें ऐका. प्रथम प्रथम या सर्वही भावंड देवतांत ऐक्यभाव होता व ते परस्परांचे हितच करीत. पण पुढें 'मी श्रेष्ठ, मी श्रेष्ठ' असा अभिमान प्रत्येकाला उत्पन्न होऊन ते सर्वही मत्सरी झाले. एकदा विष्णूने स्वशरीरप्रभावाने जल उत्पन्न करून तेथेंच निद्रा केली. त्या जलावर शेवाळ निर्माण होऊन त्यापासून ही पृथ्वी झाली. नंतर विष्णूच्या नाभीतून एक अतितेजस्वी व अतिसुंदर कमल उत्पन्न झाले. नंतर तेथे ब्रह्मदेव आले व विष्णूस जागे करून ' निर्माण करण्याचा माझा भाग (हक्क) असता, तुझी कमळ का निर्माण केले.' असा त्यास मत्सरमूलक प्रश्न केला; व आढ्यतेने असें सांगितले की, मी उत्पन्न करीन तेव्हा तुला पालन करण्याचे सामर्थ्य येईल. तस्मात मी मोठा व तूं लहान आहेस.' तेव्हा विष्णूनें सौम्यपणाने उत्तर दिले. 'मी हे कमळ केवळ गमतीने उत्पन्न केले आहे. तुझा भाग अंगावर घेण्याची

माझी बिलकुल इच्छा नाही. शिवाय, लहानमोठ्याचा प्रश्न कशाला काढतोस? मी तुझे पालन करतो ह्मणून तुझे सृष्टिकर्तृत्वाचे काम ठीक चालतें!' हें ऐकून संतापलेल्या ब्रह्मदेवाने विष्णुस सांगितलें कीं, योगमायेने माझ्या शरीरांत शिरून माझा प्रभाव पहा! विष्णु आंत जाऊन पाहतो, तों आंत अनंत ब्रह्मांडें व नाभिकमळयुक्त विष्णु पाहिलें, तेव्हां विस्मित होऊन व आंत अंत लागेना, तेव्हां बाहेर येऊन 'तू अनंत आहेस' असे ब्रह्मदेवाला नमस्कार करून सांगितलें; आणि ह्मणाला 'माझाही प्रभाव पहा.' तें ऐकून ब्रह्मदेव आंत शिरला. तेथें त्याने अनंत ब्रह्मांडे, अनंत ब्रह्मदेव व अनंत चमत्कार पाहिलें. कशाचाच अंत लागेना; तेव्हा बाहेर येण्याचा विचार करून वाट शोधूं लागला, तों वाट सांपडेना. पुष्कळ खटपट केली, तेव्हां विष्णूच्या नाभींत जें कमळ होतें ते फोडून येण्याची युक्ति त्याला सुचली व तसा तो बाहेरही आला. रागाऊन तो विष्णुला कांहीं अपशब्द बोलला. पण विष्णु शांत होता, त्याने ब्रह्मदेवाची क्षमा मागितली. 'आपण रागावलों, पण विष्णु रागावला नाहीं, तेव्हां तो आपल्यापेक्षा श्रेष्ठ आहे.' असा निश्चय करून आपले लघुत्व व विष्णूचे गुरूत्व त्याने कबूल केले मग दोघांनी असे ठरविले की, 'बाकीच्या तीन देवांचा प्रभाव काय आहे ते पाहूं या.' हे ठरवून त्यांनी शंभु, सूर्य व शक्ति यांचे स्मरण केल्याबरोबर सर्व मंडळी तेथे जमली; पण प्रथम शंकर तेथे आला. स्वागत कुशल झाल्यावर 'कां स्मरण केले?' असें शंकराने सगर्व विचारल्यावर पहिल्या दोघांनी

'आपला प्रभाव काय आहे तो पहावा, या उद्देशाने तुला बोलाविले आहे' असे सांगितले. तेव्हा क्रोधसंतप्त होऊन शंकराने 'माझे अंतकाचे काम आहे व तुमचा दोघांचाही अंतक मीच आहे' असे म्हणून आपले स्वरूप प्रकट केले. ते विश्वव्यापी स्वरूप पाहून ब्रह्मा विष्णूला आश्चर्य वाटले. नंतर ब्रह्मदेवाने वरून व विष्णूने खालून शिवस्वरूपाचा अंत लावावा, असे ठरवून उभयता निघणार इतक्यांत विष्णूने ब्रह्माजवळ एक गोष्ट मागितली व ती त्याने देण्याचे कबूल केले. असे वचन घेऊन 'तूं माझा मुलगा हो!' हा वर मागितला व वचनभंगाच्या भीतीमुळे ब्रह्मदेवाला 'होय' ह्मणावे लागले, व 'सृष्टीच्या उत्पत्तीसमयीं मी तुझ्या नाभिकमळातून बाहेर येत जाईन व तुझा आत्मज होईन' असे सांगितले. पुढे, ठरल्याप्रमाणे दोघे दोहीकडे निघाले, पण कांही पार लागेना. तेंव्हा खिन्न मनाने बाहेर येऊन त्यांनी शंकराचे स्तवन केले व 'प्रकट स्वरूप दाखवा' अशी विनती केली तेव्हा उजवीकडे ब्रह्मा, डावीकडे विष्णु व सर्व विश्वंभर शंकरलिंगाची व्याप्ति आहे असे पाहून उभयतांनी 'पूर्वरूप घ्या' असे विनविले व शंकरानी पूर्वरूप धारण करून 'वर मागा' ह्मणाले, तेव्हा विष्णूने सुचविल्यावरून 'माझा मुलगा हो' असा ब्रह्मदेवाने शंकराजवळ वर मागितला! या वरदानाने शंकर ब्रम्हाचा मुलगा व विष्णूचा नातु होऊन उभयतांच्या खालच्या पायरीवर जाऊन बसणार असे झाले. 'तुझ्या कपालापासून उत्पन्न होऊन मी तुझा मुलगा होईन' हा वर ब्रह्मदेवाला शंकराने दिला व तिघेही, 'आपण सर्वश्रेष्ठ आहो', हे समजून आनंदाने गोष्टी करूं लागले. शंकरानीही उभयतांचे स्वरूप अपार आहे असे पाहिलेच होते. याचप्रकारे सर्व प्रकाशक सूर्यांच्या व सर्वमोहक शक्तिच्या प्रभावाची परीक्षा होऊन सर्वही पांच-

जण ‘आपण पांचजण मात्र सर्वशक्ति आहों’ हे समजून महा आनंद पावले. पण पुनः त्यांस असा संशय पडला की, वेदांत तर एका प्रभूचे वर्णन आहे, पांच प्रभु आहेत असे कोणतेही शास्त्र ह्मणत नाही, वेदशास्त्र तर खोटे नसावे, तेव्हां एक प्रभु तो कोणता?’ ही शंका गणेशविस्मृतीमुळे त्यांस उत्पन्न झाली, पुढे त्यांनी दश दिशांस जाऊन वाटेल तितका शोध केला, पण कांही पत्ता लागेना. एकत्र झाले व योगमार्गाने पुनः त्यांनी ध्यान करण्यास आरंभ केला. सर्वहो समान-योग्यतेचे होते. सूर्य तेजस्वी, ब्रह्मा वेदज्ञ, विष्णु चतुर, शंकर निस्पृह व शक्ति सर्वमोहक होय. प्रत्येक स्वगुणात उत्तम म्हणून सर्व समान-प्रभावाचे होते. सर्वांचा लय लागून सर्वांची समाधि ब्रह्मस्वरूपावरच झाली. श्रीगणपतीची कृपा होऊन त्यांनी आपले स्वानंदनिवासी स्वरूप दाखविले ते स्वरूप शंकराच्या हृदयांत प्रथम अवतीर्ण झाले. शंकरास पूर्वस्मरण देऊन व ‘माझी माया विलक्षण आहे’ असे सांगून श्रीगणेश विष्णूआदि सर्व देवांस दिसते झाले. सर्वांनी स्तुति केली व सर्वांस वर प्रसाद देऊन श्रीगणपतीनी सांगितले की, ‘गर्व केव्हांहि धरूं नका, सर्वजण माझ्या स्वाधिन आहां, माझ्या तंत्राने तुम्हास वागले पाहिजे, क्रीडा करण्यासाठी मी तुम्हास निर्माण केले आहे.’ नंतर परमेश्वरांनी या देवपंचकास गुह्य ज्ञानाचा उपदेश केला व त्यास मोह-विनिर्मुक्त केले; व ‘हे पांच देव हो तुम्ही माझे, परमेश्वराचे, अंश आहांत. मायाधीन जीवांच्या दृष्टीचे विरूद्ध दिशेला, ब्रम्हाचे वक्र तोंड असते ह्मणून मला वक्रतुंड म्हणतात. माझी पूजा प्रथम करा; माझे स्मरण ठेवा ह्मणजे तुम्हास मोह होणार नाही व विघ्नेंही अडविणार नाहीत.’ इतके बोलून गणेशदेव अंतर्धान पावले व ते देवपंचक गणेशानुज्ञेने आपआपली सृष्टिगत कर्मे करूं लागले.

## ब्रह्मा–विष्णू–महेश–सूर्य–शक्ति यांचे गर्वहरण–श्रीगणपतिप्रसाद

सूत : ऋषीहो ! पार्वतीने एकदा शंकरास विचारले 'मी आपली भार्या कशी झाल्ये ?' शंकर तामसी व पार्वती मोहदा; या दोघांचा योग कसा झाला, हे शंकर पार्वतीला सांगतात, ते ऐका : 'पार्वती ! त्यावेळी आम्ही सगळ्यांचे प्रभाव पाहून झाल्यावर तुझ ऐश्वर्य पाहून मला फार आश्चर्य वाटले ह्मणून तुझ्या प्राप्तीसाठी मी मोठी तपश्चर्या केली व तुला प्रसन्न करून घेऊन तुझ्यापाशी वर मागितला की माझी भार्या हो !' आणि तूं माझा वर पूर्ण केलास. ब्रह्मदेवपत्नी सावित्री तुझ्या उजव्या अंगापासून व नारायणपत्नी लक्ष्मी तुझ्या डाव्या आणि रविपत्नी 'संज्ञा' ही तुझ्या हृदयापासून, असा या तिघींचा जन्म आहे. ' नंतर पार्वतीने गणपतीची तपश्चर्या करून शांति प्राप्त करून घेतली व शंकरसान्निध्याला राहिली.

## मुद्‌गलाचे पूर्ववृत्त

ऋषींहो ! दक्षाने मुद्गलास विचारले :— 'श्रीगणपतींने वक्रतुंड, एकदंत, महोदर, गजानन, लंबोदर, विकट, विघ्नराज, व धूम्रवर्ण असे आठ अवतार घेतले त्याची कारणे व अवतारचरित्रे मला सांगता काय ? आपण संत आहां. लोककल्याणार्थ आपला संचार आहे. कृपा करा व मला अखंडानंद व स्वानंदनिवासी ब्रह्माने अवतार का घेतले ते व अवतारचरित्रे सांगा.' ऋषींनी ही विनंति मान्य केली व प्रथमतः आपली कथा सांगून मग अवतारकथनास सुरवात केली. राजा ! मी, मुद्गल ऋषि, उग्र तपश्चर्या करून पंधरावे दिवशी मात्र एक द्रोणभर अन्न खावयाचे असा संकल्प करिता झालो व

व गणपतीच्या ध्यानाला बसलो. कांही दिवस गेल्यावर देवांस ' हा आपले पद घेणार की काय ? ' अशी काळजी पडली; ह्मणून सत्व-हरणार्थ त्यांनी दुर्वास ऋषीला मजकडे पाठविले. पारण्याच्या दिवशी दुर्वास मुनि आले व माझे द्रोणभर अन्न घेऊन खाऊन गेले. मला संतोष झाला. काहीं न खाता मी पुनः तपाचरणास बसलो, पंधरावे दिवशी म्हणजे द्वादशीला उत्थान करून जमविलेली कणसें घेऊन व त्यांचा नैवद्य दाखवून मी पारणे सोडणार तों पूर्ववत् दुर्वास दत्त म्हणून आले व पुनः भिक्षा मागून मी दिलेले अन्न भक्षून निघून गेले. याप्रमाणे तीन महिने उपोषणाचे लोटले. श्रीकृपेने माझ्या तपश्चर्येला विघ्न आले नाहीं. पुढे दुर्वासांनी हे माझे सत्व पाहून आपले स्वरूप प्रकट केले, व मला पुष्कळसे वर दिले. नंतर ते निघून गेले, इतक्यात विमान घेऊन देवदूत आले व ' इंद्रानी बोलाविले आहे, चला,' असे म्हणाले. पण त्यांच्याकडून स्वर्गातील भोगांचे, पुण्य सरल्यानंतर अधःपाताचे व स्वर्गस्थ लोकांच्या निष्करुणतेचे वर्णन ऐकून मला वैराग्य झाले व त्याच देवदूतांस निर्दुष्ट अशा ब्रह्मपदाचा मार्ग विचारला. व देवदूतांनी मला धर्मार्थादि मोक्षापर्यंतचा मार्ग सांगितला. तेव्हा स्वर्गामध्ये पुनः खाली पडण्याचे भय आहे म्हणून येत नाहीं. असे मी सांगितल्यावर देवदूतांनी स्वर्गाचे मनमोहक वर्णन केले. तथापिही मी वश होईना. मला दुःखविरहित सुख हवे होते व ते देणे स्वर्गाच्या हाती नव्हते. असो; देवदूत गेल्यावर ब्रह्म कसे संपादन करावे, याचा मीं पुष्कळ विचार केला, पण निश्चय होईना. तेंव्हा महाब्रह्मज्ञ अंगिरस मुनींच्या पवित्र आश्रमात जाऊन तेथील शांत

निर्वैर–स्थिति पाहिल्यावर माझें मन प्रसन्न झाले. तसेच, तेथे एका
गोड असा वेदनिर्घोष चाललेला ऐकून, यज्ञयागांत झालेल्या भूमी
पवित्र स्पर्श सेवन करून, तेथील अग, खग, नग, मृगांची अभि
संपत्ति पाहून मनाला आश्चर्य, आनंद व धन्यता वाटली.
कुशासनावर बसलेल्या त्या तपोधन, अपरसूर्य अंगिरसाची गंभीर
ब्रह्मनिरुपणामध्यें तल्लीन झाली आहे, असें पाहून भक्त्यश्रुपूर्ण नयनां
व सहसा नम्र झालेल्या मस्तकाने त्या महर्षीस नमस्कार केला. त्यांनी
पुत्रभावाने माझ्या मस्तकाचे अवघ्राण करून मला आशिर्वाद दि
कांही दिवस त्यांची सेवा केल्यानंतर ' महाराज ' ब्रह्माचे वर्णन वेदाम
अनेक प्रकारचे आहे; तेंव्हा कोणते वर्णन प्रमाण मानावे, हे स्प
करून सांगावे ' अशी विनंती केली. नंतर अन्नब्रह्म, प्राणब्रह्म मनोब्रह्म,
विज्ञानब्रह्म व आनंदब्रह्म इत्यादि जे ब्रह्मप्रकार सांगितले, ते सर्व
नीटच आहेत व ते अन्नकोश, प्राणकोश, मनःकोश, विज्ञानकोश व
आनंदकोश प्रकाशित करितात. ह्यापुढे, महाकारणाचा आधार चैतन्य-
ब्रह्म, बिंदुब्रह्म, ' सोहं ' मात्रात्मक चिद्‌ब्रह्म, बोधब्रह्म, विदेहाधारक
सांख्यब्रह्म, नंदनात्मक समब्रह्म, सहज अव्यक्तब्रह्म, असद्रूपप्रकाशक
शक्तिब्रह्म, आत्मरूप सूर्यब्रह्म, उभयात्मक विष्णुब्रह्म, निर्मोहप्रकाशक
शिवब्रह्म, व संयोगमय स्वानंदब्रह्म इत्यादि अनेक प्रकारची ब्रह्मवर्णने
आहेत व ती ती जीवाच्या अधिकारानुसार योग्यच आहेत. बृहं
' म्हणजे मोठे होणे ' यापासून ब्रह्म म्हणजे अमर्याद महत्त्व, असा
अर्थ झाला आहे, असो; अन्नब्रह्मापासून चिद्‌ब्रह्मापर्यंतची ब्रह्मरूपें
उपाधियुक्त आहेत. या पुढची रूपे श्रेष्ठ, श्रेष्ठतर अशी आहेत. या
सर्वांस ' गण ' अशी सज्ञा आहे. त्याचा स्वामी तो गणेश होय.
यालाच ब्रह्मणस्पति म्हणतात. योग्य मार्गांने वरील गणांचे संपादन

करून गणपतीची भक्ति केली तर ब्रह्मतादात्म्य पावशील. ह्मणून प्रथम योगाभ्यास कर. नंतर गणपतीच्या अवतारकथा समजून घे. पुढे तुला भक्ति उत्पन्न होईल आणि एकनिष्ठ भक्तिचा अवलंब केलास ह्मणजे भगवान प्रसन्न होऊन तुला स्वानंदब्रह्म नामक शांतिब्रह्माची प्राप्ती करून देतील. आता प्रथम गणपतीच्या मुख्य मुख्य अवतारकथा सांगतो, ऐक;

## मत्सरा सुरजन्म–मत्सराला शंकर वर देतात–देवदैत्ययुद्ध–शंकरमत्सरयुद्ध

प्रथम वक्रतुंडावतार कथा सांगतो. दक्षा! या कथेला आरंभ करावयाचे अगोदर नवविधा भक्तिचे प्रकार सांगतो. श्रवण, किर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, आत्मनिवेदन, हे भक्तिरस प्रवर्धक प्रकार आहेत गणपतीच्या कथांचे श्रवण, त्यांचे प्रवचन, गणपतीचे स्मरण, चरणसेवा, त्याची पूजा, त्याला नमस्कार, त्याची सेवा, त्याचे सख्य व त्याला आत्मसंबंधी निवेदन हे सर्व भक्ति-प्रपोषक प्रकार आहेत. उत्तरोत्तर श्रवणानतर कीर्तन, नंतर स्मरण अशा भूमिका आक्रमित गेले म्हणजे श्रीगणेशाचे पूर्ण ज्ञान होऊन स्वानंदवासी होता येते. असो; आता वक्रतुंडकथेकडे वळू. देवांचा असा संप्रदाय आहे की, ज्या दिवशी इंद्राला स्वपदप्राप्ति झाली तो वर्षाचा दिवस, ते मोठ्या समारंभाने साजरा करितात. एकवर्षी ह्या वार्षिक उत्सवाला ब्रह्मा, विष्णु, शंकर, सूर्य, वरुण, अग्नि, धर्म (यम), कुबेर इत्यादि देव सकुटुंब व सपरिवार आले होते. त्याचप्रमाणे सिद्ध, यक्ष, गंधर्व, किन्नर, नाग हेही तेथे विद्यमान होते. सर्व देवर्षि राजर्षि विराजमान झाले होते. नारद तुंबर तेथे होते हे सांगावयास नकोच. सर्वत्र जिकडे तिकडे गडबड उडाली

आहे, सभा थाटून बसली आहे, अप्सरा नाचत आहेत, गंधर्व गात आहेत, वाद्ये वाजत आहेत, चारण स्तोत्रें ह्मणतात, असा, सर्वमनोहर कार्यक्रमानुरूप उत्सव चालला असता अभिनवसुन्दर रंभा हावभावयुक्त इतक्या ललितपूर्ण कौशल्याने आपला मंजुळ नाच सुरु करिती झाली. की तिचे ते रूप, तिचे नेत्रकटाक्ष तिचे पदविभ्रम इत्यादि रतिप्रपोषक नृत्य पाहून इंद्र कामातुर झाला. त्याने लज्जा सोडून दिली. समारंभ बंद करून आणि निर्लज्ज होऊन रंभेसह तो जलक्रिडा करण्यासाठी वनात निघून गेला, व रंभेबरोबर क्रिडा करीत कित्येक दिवस वनातच राहिला. तो तेथे असता अकस्मात दुर्वास ऋषींची स्वारी त्याचठिकाणी प्राप्त झाली. त्या मुनीचे ते तपस्तेज पाहून इंद्राला खिन्नता प्राप्त झाली. रंभेला त्याने झिडकारून देऊन मुनिवर्यांस नमस्कार केला; पण त्याची ती नीचावस्था पाहून मुनिही त्याच्याशी अवाक्षर न बोलता एकदम तडक चालते झाले. हा मुनिकोप व ही आपली पशुसमता इत्यादि पाहून इंद्र भयाभित झाला त्याची गात्रे विगलित झाली. तेव्हांच त्याचे वीर्य पतन झाले आणि रंभेस तेथेच ठेऊन तो आपल्या राज्यात अगदी खिन्नमनस्क होऊन गेला. इकडे त्या भुमीवर पडलेल्या वीर्यांपासून एक महाभयंकर राक्षस उत्पन्न झाला. त्याचे संगोपन मातृवात्सल्यपुरःसर पृथ्वीने केले. तो आजानुबाहु, दीर्घाक्ष, महावक्षा ( मोठ्या छातीचा) बळकट. रक्तवर्ण. व तेजस्वीं असा होता. त्याचे 'मत्सरासुर' असे नाव ठेवले. पुढे पांचव्या वर्षीं त्याची मुंज झाली. नंतर तो सर्व वेदविद्यापारंगत झाल्यावर आपले लग्न करिता झाला. त्याची 'मदकरा' या नावाची स्त्री ही दुर्बुद्धीची कन्या होती. लग्न झाल्यावर कांही दिवसांनी त्याला अशी इच्छा उत्पन्न झाली की,

आपल्यास त्रैलोक्याचे स्वामित्व मिळावे. अर्थातच ही इच्छा सफल होण्याला तपश्चर्येची आवश्यकता होती,. ह्मणून त्याने शुक्रगुरुकडे जाऊन पंचाक्षरी मंत्राचा उपदेश घेतला व शिवाची तपश्चर्या करून त्याला संतुष्ट केले. पण हे करण्याला त्याला एक सहस्र वर्षे उग्र व एकनिष्ठ तपश्चर्या कंदमुळे भक्षून करावी लागली. या उग्र तपश्चर्येचे तेज इतके फाकले की, प्रत्यक्ष सूर्यादि तेजोदेवतांसहीं ते असह्य झाले. असो; शंकर प्रसन्न झाले व 'वर माग' असे म्हणाले. ती करुणपूर्ण वाणी ऐकून मत्सराने आपले डोळे उघडले. त्यांच्या पायांवर मस्तक ठेवले आणि पूजा करून उत्तम प्रकारची स्तुति केली. ती ऐकून शंकर जास्तच संतुष्ट झाले आणि तुला काय पाहिजे ते माग, मी देतो' असे वचन दिले. 'देवा! आपण प्रसन्नच झालां आहांत, तेव्हां पंचमहाभूतात्मक व त्रिगुणसंवलित वस्तूपासून मला मरण नसावे, आरोग्यादि सर्व प्रकारचे ऐश्वर्य असावे आणि ब्रह्मांडाचे राज्य मिळावे, हे वर द्या.' हे मागितले. भोळ्या शंकरानी 'तथास्तु' म्हणून ते अंतर्धान पावले. नंतर अतिहर्षयुक्त होऊन मत्सरासुर घरी गेला. त्याच्या मातुःश्रीस,पत्नीस व इष्टमित्रांसही अतिआनंद झाला. पुढे काही दिवसांनी त्याला 'सुंदरप्रिय' व 'विजयप्रिय' असे दोन तेजस्वी पुत्र झाले. त्या पुत्रांस घेऊन मत्सरासुर एक दिवस आपल्या सासुरवाडीला गेला. त्याच दिवशी तेथे सर्व दैत्यमंडळी जमली होती. बोलतां बोलता मत्सरासुराने वरदान मिळविले त्याच्या गोष्टो निघाल्या व दैत्यांनीं त्या असुराला आग्रह केला की. वरानुसार त्रैलोक्य जिंकण्याचा हेतु सिद्धीस न्यावा. मत्सरासुरास तेच हवे होते. एक फक्त त्याची भूमिमाता त्याला अनुकूल नव्हती. कारण इंद्राच्या पुत्रानेच इंद्राचे

राज्य हरण करावे हे तिला संमत नव्हते. पण दैत्यांनीं 'शंभूने जलंधरासुराने शंभूविरुद्ध लढाई करून त्याचा पराभव केला' दाखला दिला व या कामात मातेचे वगैरे ऐकण्यात कांही अर्थ नाही असे सांगितले. नतर सर्व मंडळी शुक्राचार्याकडे जाऊन त्यांना मत्सराच्या राज्याभिषेकार्थ घेऊन आली. राज्याभिषेक यथाविधि झाला. राजपद प्राप्त झाल्यावर मत्सरासुराने आपली महापराक्रमी राक्षसी चतुरंग सेना शस्त्रास्त्रांसह सज्ज केली. अनेक सहस्र हत्ती, तसेच अश्वारूढ योध्दे, तितकेच रथ व पदाति घेऊन मत्सरासुर सहपुत्र निघाला. त्यांनी थोडक्याच वेळात पृथ्वीवरील क्षत्रियांचा पराभव करून जे जे राजे मेले, त्यांचे पुत्र राज्यावर बसवून त्यास व जिवंत राहिले त्यासही करभार घेऊन मांडलिक केले. याप्रमाणे सर्वच्या सर्व ससद्वीप पृथ्वी पादाक्रांत केल्यावर हे अजिंक्य सैन्य पाताळात शिरले. येथे मोठेच घनघोर युद्ध झाले. हजारो दैत्य व हजारो नाग मारले गेले. रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या. एकदा दैत्यांनी जोर करून नागांस मागे हटवून त्यांचे हजारो वीर समरांगणात ठार केले. तेव्हा वासुकी नामक मुख्य नागाला संताप येऊन त्याने पळणाऱ्या नागास धीर दिला आणि आपल्या मारक विषाचा असा पर्जन्य पाडला की, सर्व पाताळच्या पाताळ दग्ध होऊ लागले, हजारों दैत्य माशासारखे तडफडून मरू लागले, त्यांची शस्त्रे जळाली, हत्तीघोड्यांची राख झाली, एक क्षणभर एके ठिकाणी ऊभे राहतां येईना, असा दारुण प्रसंग प्राप्त झाला. तेव्हा विरोचन धीर धरुन उठला व शुक्राची प्रार्थना करून त्यांनी ह्मटलेल्या मत्रप्रभावाच्या साहाय्याने सर्व असुर विषरहित केले. ह्या दैत्यांनी गरुडांस्त्राचा जप केल्याबरोबर हजारो गरुड उत्पन्न होऊन त्यांनी नागांचा संहार केला. वासुकीने आपल्या विषप्रभावां

गरुडांचा नाश केला. तेव्हा दैत्यांनी स्वतःच गरुडांची रुपे घेतली व नागांचा संहार केला. नागसैन्याचा येणप्रमाणे पराजय होऊन अवशिष्ट सैन्य मागे फिरले. हा वृत्तांत शेषनागाला कळल्यावर तो साम करण्याच्या बुद्धीने बाहेर आला व दैत्यांकडे जाऊन नम्र वाणीने त्याने सांगितले; 'अहो तुमचे व आमचे वैर काय म्हणून ? आपण सगळे पाताळवासीना ?' हे ऐकून विरोचनाने सांगितले. की 'आपण करभार देण्याला कबूल असाल तर व त्रैलोक्याचे आधिपत्य मिळवू इच्छिणाऱ्या मत्सरासुराचे श्रेठत्व मान्य करीत असाल, तर आह्मी आपले बाण भात्यात घालण्यास तयारच आहोत.' नागास हेच हवे होते. ते करभार देऊन मोकळे झाले. नंतर असुरांनी वरुणलोकांवर स्वारी केली. तेथेही तीन चार दिवस घनघोर युद्ध झाले. राक्षस जखमी झाले अगर मेले तर त्यांच्या जखमा बऱ्या करणारे व त्यांस जिवंत करणारे शुक्राचार्य होते, ह्मणून राक्षस बलवत्तर झाले व वरुण व त्याचे जलचर अनुयायी यांस पकडून त्यापासून ते राक्षस करभार घेते झाले. नंतर उत्तर दिशेकडे त्यानी धनपति कुबेराच्या राज्यावर चाल केली. पण कुबेराने 'य : पलाय' केल्यासुळे दैत्यांस अलका नगरीत सुखाने प्रवेश करता आला व तेथे आपले स्वामित्व स्थापता आले. नंतर मृत्युस्वरुपी यमाशी व त्याच्या रोगरुपी सैन्याशी पांच दिवस लढून दैत्यांनी त्यांचा पराभव केला व यमास बंदीत घातले. लागलीच त्यांनी आपला मोर्चा अमरावतीकडे फिरविला तेथेही देवदैत्यांचे सात दिवस अतिभयंकर युद्ध झाले. दैत्यांचा एकदा कोठें पराभव होण्याचा संभव दिसू लागला तो सुंदरप्रिय, मत्सराचा पुत्र सिंहनाद करीतच तेथे आला. त्याने इंद्रावर हल्ला केला. इंद्राने आपले अमोघ शस्त्र वज्र त्याच्या अंगावर टाकले. पण तो

दैत्यपुत्र एक पाऊलही मागे सरला नाही, इतकेच नव्हे तर त्याने ऐरावतनामक इंद्राच्या वाहनाला मूर्छित करून इंद्राचा पाय धरून खाली ओढले व त्याला पकडून घेऊन तो आपल्या बापाजवळ गेला. हा पुत्राचा पराक्रम पाहून बापाला जो आनंद झाला तो केवळ सत्पुत्राचे पराक्रम पाहणाऱ्या बापासच कळणार? असो; इंद्राला पकडल्यावर सर्व देव पळून गेले आणि स्वर्गाची मालकी मत्सरासुराकडे आली. इकडे सर्व देव कश्यपास घेऊन सर्व ऋषी-समागमें ब्रह्मदेवाकडे गेले व करुण वृत्तांत सांगितला. ब्रह्मदेवाने आपल्या हातून काही होणार नाही; असे पाहिले व त्यास घेऊन तो विष्णुकडे गेला. सर्वपालक विष्णूनेही 'शंकरवराने प्रमत्त झालेल्या असुराचा पराभव करण्यास आपण असमर्थ आहो' असे सांगितल्यावर सर्व मंडळी कैलासाला शंकराकडे गेली. पण त्यानेही आपल्यास कांही करता येणार नाही, असे सांगितले. पुनः शंकर ह्मणाले, 'विष्णु! तूं बुद्धिवान् आहेस, कांही तरी शक्कल काढ. पण विष्णूस युक्ति सुचेना. मग देवांनी आपापले लोक सोडून कैलासावर येऊन राहण्याचा बेत केला. त्यास वाटलें कीं, मत्सरासुर कैलासावर येऊन काही गडबड करणार नाही. कारण कैलास ह्मणजे मत्सरासुराच्या इष्ट देवतेचे स्थान होते. इकडे मत्सराने अमरावतीस जाऊन इंद्राचे सर्व भोग भोगण्यास आरंभ केला. सिद्ध, गंधर्व, चारण हे त्याची सेवा करूं लागले. मत्सराने आपल्या विरोचनादि मित्रास देवांची स्थाने दिली. इतक्यात त्याला आठवण झाली की, ब्रह्मा, विष्णु, शंकर हे देवतात्रय आपल्या अभिनंदनास आले नाही. तेव्हा त्याने आपल्या प्रबल अशा अंधकासुराबरोबर 'बऱ्या बोलाने या; नाहीतर आपल्यास पकडून आणावे लागेल' असा निरोप तिघास, पण प्रथम ब्रह्मदेवास

पाठविला. अंधक सत्यलोकी गेला. पण तेथे कोणी नाही; असे पाहून तो वैकुंठास गेला तेथेही ओसाड पाहून तो कैलासास गेला. तेथे पाहतो तो सर्व देव, सर्व ऋषी आनंदात बसले होते. हे पाहून त्याला वाईट वाटले. तो आंत गेला तेव्हां त्यास सत्कार-पूर्वक एका आसनावर नेऊन बसविले. पुढे शिष्टरीतीचा धि:कार करून अंधकाने शिवास सांगितले की 'माझ्या धन्याने सर्व स्वर्गलोकावर आपले स्वामित्व प्रस्थापित केले आहे. तो स्वर्गाचा स्वामी आहे, ह्मणून त्याच्या दर्शनासाठी व त्याची चरणसेवा करण्यासाठी तुम्ही तिघाजणांनी आता माझ्याबरोबर चलावे. नाही तर तुमचे कल्याण होणार नाही.' हा उर्मट निरोप ऐकून शंकर क्रोधसंतप्त झाला. आपणच वर देऊन मत्सराला मातविला व आता तो उलट गोष्टी सांगावयास लागला आहे, हे पाहून त्यास वाईटही वाटले. असो; 'आह्मी येत नाही, आह्मी काही त्याचे चाकर नाही.' असे प्रत्युत्तर शंकराने दिले व तो अंधक ते उत्तर जसेच्या तसे मत्सरासुराला भरसभेत सांगता झाला. अर्थातच मत्सरासुर खवळून जाऊन ह्मणाला की, 'मला वर दिला ह्मणून शंकराला असा मान यावा काय? तप केले ह्मणून मला वर मिळाले. त्यात शंकराने आपल्या पदरचे मला काय दिले? काही न करिता दिले असते, तर बरीक तो जगदीश्वर खरा झाला असता. चला, त्याच्या लोकाला जाऊन आपण त्याला बंदीवान करून आणू. तो आपल्याला मोठा समजतो काय? बेटा जसा तो, तसाच मी. त्याने कर्म केले. त्याला कैलास मिळाला; मी कर्म केले, मला त्रैलोक्याचे राज्य मिळाले. सर्व विश्व कर्माधीन आहे. ह्यात त्याची काय प्रतिष्ठा? चला, उठा, तयार व्हा, आज कैलासावर स्वारी आहे." झाले; सैन्य तयार झाले

व कैलासावर चाल करून गेले. पर्वताच्या माचीवर जे राखणदार शिवगण होते त्यास राक्षसांनी आधी हाकून लाविले. शत्रु गर्जना ऐकून कैलासावर जे जे देव होते त्यांनी लढाईचा वेष धारण केला. वीरभद्रादी सर्व शिवगण, विष्णु, ब्रह्मा, सूर्य काली इत्यादि सर्व देव शस्त्रास्त्रांनी सज्ज होऊन रणांगणावर गेले. शंकरही नंदिकेश्वरावर आरूढ होऊन तेथे आला. नंतर देवदैत्यामध्यें हाणामारीचे मोठे घनघोर युद्ध झाले. बाणांचा वर्षाव असा कांहीं झाला की, ' न भूतो न भविष्यति ' जिकडे तिकडे काळोख पडला. आपपर ओळखता येईना; घंटा, शंख, तुताऱ्या, शिंगे, नौबती यांची, तसेच अश्व, हत्ती, वाघ, सिंह इत्यादि यांची भैरव गर्जना अशी कांहीं दुमदुमून राहिली की, कोणाचे बोलणे कोणास ऐकूं जाईना. मारामारी पराकाष्ठेची झाली. रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या व त्यांतच हत्तींचीं, घोड्यांची, देवदानवांची धडे तरंगतांना दिसूं लागली. असो; पुढें राक्षसांनी महापराक्रम करून देवांची फळी फोडली व त्यांस पळावयास लाविले, देवसेनापतींनी देवांस थांबविण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ. त्यांतच द्वंद्व युद्धास आरंभ झाला. विषयप्रिय आणि ब्रह्मा, सुंदरप्रिय आणि शंकर, प्रल्हाद आणि विष्णु, विप्रचिती आणि सूर्य इत्यादिकांचे भयंकर द्वंद्व युद्ध सुरू झाले. ह्या थडकाथडकीच्या झोंबाझोंबीनें बिचारी भूमि कांपावयास लागली. याप्रमाणे नऊ दिवस अहोरात्र युद्ध झाले. मत्सरासुर नुसता हा युद्ध-चमत्कार पाहत होता व आपल्या अनुयायांस उत्तेजित देत होता. दहाव्या दिवशी राक्षस पुनः एक

होऊन चालून येत आहेत, असे पाहून विष्णुशंकरांनी आपली अमोघ अस्त्रे त्यांच्यावर फेंकली, त्रिशुलांचा व चक्रांचा भडिमार केला, तेव्हा दैत्य मागे हटले, हजारों दैत्य मृतप्राय पडले व बाकीचे गडबडून गेले. हे पाहून व आपण प्रत्यक्ष गेलो नाहीतर दैत्यांचा पराभव होतो, असे जाणून मत्सरासुराने महानाद करून, धनुष्याचा टणत्कार करून व बाणांचा प्रलयकालीन पर्जन्य पाडून त्यानें असा काही पराक्रम केला की, विष्णु शंकरसुद्धा तोंडांत बोट घालून गप्प बसले. इकडे मत्सराच्या अचुक शरसंधानाने कुमार कार्तिकेय, वीरभद्र, अग्नि, वायु महाकाली, ब्रह्मा हे व इतर मुर्छित झाले. विष्णु: युद्धास प्रवृत्त झाला. तो त्याचीही तीच अवस्था झाली व तो धरणीवर मृतप्राय होऊन पडला. शंकराचा त्रिशूल नांहीसा करून गळयात पाश घालून शंकरास ओढीत नेले व तुच्छतादर्शक हास्य करून विचारले ‘ उगीच ऐट कशाला ? गर्व टाकून दे ’ असें ह्मणून शंकरास व विष्णू आदि सर्व देवांस बंदीत टाकले. आणि आपण कैलासपदी बसून तेथील अनुपमेय भोग मोठ्या आढ्यतेने भोगावयास लागला.

## मत्सर–ब्रह्मांडाचा अधिपति होतो–धर्मलोप

यांप्रमाणे मत्सर हा ब्रह्मांडाधिपती झाला. त्याने कैलासावर सुंदरप्रियांची, वैकुंठावर विषयप्रियांची, सत्यलोकावर प्रल्हादाची अशा योजना केल्या आणि आपण भूलोकावर येऊन तेथे एक रम्य व विस्तीर्ण नगर निर्माण केले आणि त्रैलोक्याची ती राजधानी केली. व स्वतेजाने सर्वत्र आपले स्वामित्व सुस्थिर करून सर्व प्रकारचे भोग

सेवन करू लागला. शिवादि सर्व देव त्याने राजधानीत आणिले होते. पुढे सर्वथा दीन झालेल्या देवांस पाहून तो त्यास हर्षाने म्हणाला, 'माझी आज्ञा व माझे वर्चस्व मान्य करा, आणि तुह्मांस वाटेल तिकडे संसार करावयास जा.' शंकरादिकांस ही मोकळीक मिळाल्याबर तेथून ते निसटले आणि पर्वताच्या दऱ्याखोऱ्यात जाऊन दुःख करीत व 'हेही दिवस जातील' असे म्हणत बसले. इकडे मत्सराने देवळा-तील देवांच्या प्रतिमा फोडून तेथे आपल्या प्रतिमा बसविल्या. धर्मलोप होत चालला, वेदपठण, तपश्चर्या, योगयाग इत्यादि सर्व राहिले. 'घरोघर मत्सराची पूजा करा' अशी आज्ञापत्रे सुटली. 'वेदोक्त मंत्रांनी माझी पूजा करून, मला अर्पण करण्यासाठी यज्ञ करा' असे त्याने ब्राह्मणास सांगितले व ज्यांनी ऐकले नाही, त्यांना ठोक दिला. तसेच, गायत्रीजप, अग्निहोत्रादि सर्व विधि मत्सराच्या नावाने होऊ लागले. सारांश 'मत्सर हा ईश्वर आहे' अशी भावना उत्पन्न करण्या-विषयीचे सर्व उपाय मत्सराने केले. प्रजेपैकी प्रत्येकजण मत्सरभक्त व देवद्वेष्टा झाला. स्वाहा, स्वधा यांचा लोप झाल्यामुळे देवपितरांस खड-खडित उपास पडू लागले. अर्थातच देवास सुखाचा लवलेशहि मिळत नव्हता. पण त्यांच्या सुदैवानी तेथे महायोगी श्रीदत्त महागणेशभक्त, देवांच्या समाचाराकरिता आले. शंकरादि सर्व देवांनी त्याना नमस्कार करून व 'योगी विरक्त तथापि लोकहितकर्ते आपण आहा' अशी वास्तविक भक्तिपुरःसर स्तुति करून त्यांस विचारले. 'महाराज'! धर्मलोप झाला, सर्व जग भोगमय झाले आहे. आह्मी असे निर्जळ निराहार करीत आहो. तेव्हां दुःखविमोचनाचा कांही उपाय सांगा. तेव्हा दत्ताने उत्तर दिले.

## वक्रतुंडाचा जन्म–मत्सराचे गर्वहरण व गणेशस्तवन

'शंकरा ! तुम्हांस सर्व समजतेच आहे, तथापि विचारलें ह्मणून सांगतो. क्षमा करा, 'मी सर्वेश्वर आहे' असा जो गर्वयुक्त मत्सर तुमचे हृदयांत वास्तव्य करीत आहे तो मारा, म्हणजे बाहेरचा मत्सर मरेल. आपल्यापेक्षां श्रेष्ठ कोणी भेटला ह्मणजे जी ईर्ष्या, असूया तुमच्या मनांत उद्भवते, ती नाहीशी करा. गणेशाचा एकाक्षरी मंत्राने योगपूर्वक सेवा केली ह्मणजे ही ईर्ष्या नष्ट होईल. तुह्मी गणेशाची सेवा करा, तुमच्या सर्व संकटांचा परिहार होईल.' याप्रमाणे शंकरासहित सर्व देवांनी तपश्चर्या करण्याचे कबूल केल्यावर दत्तयोगी अंतर्धान पावले. देवांनी स्थिरसुख आसने घालून एकनिष्ठेने एकाक्षरी मंत्राचा जप पुजापुरःसर केला. हजार वर्षे झाल्यावर श्रीगणपति प्रकट झाले. सिंहारूढ, गजवक्त्र, शूर्पकर्ण, महोदर, चतुर्बाहु, पाशांकुशविराजित, सिद्धिबुद्धियुत, किरिटकुंडलधारी, अशी तेजस्वी मूर्ति आर्विभूत झाली. व 'वर मागा, प्रसन्न झालो' असे ह्मणाली, देव, ऋषी इत्यादि देवांनी सहस्रशः नमस्कार करून भक्तिपुरःसर श्रीगणेश देवाची स्तुति करून मागणे मागितले की, 'जगताला पीडा देणाऱ्या मत्सरासुराचा नाश करा.' श्रीगणेशाने उत्तर केलें. 'शंकराने त्याला विलक्षण वर दिले आहेत; तथापि तुमचे हित होईल ते मी करीन, भिऊं नका.' असे ह्मणून श्रीदेवांनी आपल्या गणांचे स्मरण केले. त्याबरोबर, सर्व गणमंडळी शस्त्रास्त्रांसहित तेथे प्रकट झाली. नंतर त्यास 'मत्सरासुराचा नाश करावयाचा आहे, त्याला युद्धचमत्कार दाखवून मग

त्याचा समाचार घेऊं. चला. ' अशी आज्ञा झाली. आनंदाने त्यांनीही मत्सरपुरावर स्वारी केली. इकडे मत्सरासुर आपल्या ऐश्वर्याच्या आढ्यतेत व नाचरंग, खाणेपिणे इत्यादि उपभोगांत दंग होऊन गेला होता लक्ष्मी मागून भोग आणि भोगामागून रोग, हे चक्र चालावयाचेच. ज्ञान व भक्ति असतील तर लक्ष्मीही कांही करू शकत नाही. असो; गर्व झाला होता, तथापि मत्सरालाही भय देणारी अशुभ चिन्हे होऊ लागली व आपला काळ संपला, असे त्यास वाटावयास लागले. पुनः 'माझा नाश कशानेच व्हावयाचा नाही, असा मला शंकरवर आहे, भिण्याचे कारण नाही' असेही वाटले. गणेशगणांची स्वारी येऊन थडकल्यावर भयाने व क्रोधाने विव्हल होऊन आपल्या 'अजिंक्य' चतुरंग बलासह तो युद्धाकरतां बाहेर पडला; पण त्याचे चित्त बावरल्यासारखे झाले होते. असो; यावेळीही देवदैत्यांचे अतिभयंकर युद्ध झाले. कित्येक दिवसपर्यंत कोणाचा जय होतो, हे कळेना. प्रल्हाद व इंद्र यांचे व्दंद्व युद्ध झाले, त्यांत प्रल्हादाचा पराभव झाला. नंतर महिषासुराने इंद्राशी गांठ घातली, तो तिकडून अग्नि आला, तिकडून विरोचन, इकडून यम अशी पुनः युद्धाची धुमश्चक्री उडाली. शंकर विष्णु हेही आले, पण त्यांचेही मत्सरपुत्रांपुढें कांही चालेना. हे पाहून श्रीगणेशाचे प्रमोद, आमोद, ब्रह्मप्रिय, योगप्रिय इत्यादि गणनायक आपआपल्या पथकांसह पुढे सरसावले पुनः युद्धे जुंपली दैत्यास पुनः पुनः सावध करणाऱ्या शुक्रमुनीला ब्रह्मप्रियाने एका दूरच्या गुहेत कोंडून ठेविले. तेव्हां आधारशून्य दैत्यसैन्यांत हाहाकार झाला व मरावयाचे व मारावयाचे असा निश्चय करून ते युद्धाला सरसावले. पण प्रमोदाने त्यांच्यावर भयंकर शरवृष्टि करून त्यांचा विलक्षण संहार केला व मत्सराच्या दोन्ही पुत्रांस ठार केले. ते पाहून मत्सराचा शोक

अनावर झाला व पुत्र मेल्यावर जगून काय करावयाचे आहे, असे त्यास वाटले. पुढे त्याचे सांत्वन वृद्धांनी केल्यावर मत्सरासुर युद्धाच्या तयारीने आला. देवांस पुनः भीति उत्पन्न झाली. आपली आता धडगत नाही, पुनः हा मत्सरासुर आपणा सर्वांचा लढाईत पराजय करील की काय, अशी जबरदस्त धास्ती लढाई सुरू होण्याच्या आधीच त्यांनी घेतली. वक्रतुंडानी त्यांस पुस्कळ धीर दिला, पण लढाईच्या जागी येऊन उभे राहाण्याचे त्यांनी नाकारले. असो; मत्सरासुर रणांगणावर आला तो, वक्रतुंड कोठे आहे, असे ओरडतच आला. वक्रतुंडही त्याचा समाचार घेण्यासाठी सज्ज झाले. ते समोर आल्यावर 'तूं मूर्ख आहेस, शंकरविष्णूंनी लबाडी करून तुला फसविले आहे, मला शरण ये, सुखाने राहशील' इत्यादि क्रोधयुक्त व तिरस्कारयुक्त स्वराने मत्सर बोलला. त्यावर हांसत हांसत, वक्रतुंड ह्मणाले : 'गर्व करूं नको; मी पंचभूतात्मक नाही, त्रिगुणसर्वीलितही नाही, मला अहंकाराचा किंवा महताचा किंवा प्रकृतीचा सबंध नाही. मी आनंदरुप ब्रह्म केवळ तुझा नाश करून मुनिदेवांची स्थापना करण्यासाठी अवतीर्ण झालो आहे. तुझे पुण्य संपले. तुझा वरप्रसाद शिथिल झाला आहे, तर देवादिकांचा व मुनींचा द्वेष करणार नाहीस, वैदिकधर्मांचा दास होशील, तर तुला जिवंत ठेवितो. बोल लवकर.' हे बोलणे ऐकून व गणपतीचे स्वरूप पाहून तो आश्चर्यविस्मित झाला. व नम्रतेने बोलला 'आपण जर समरूपी ब्रह्म आहा, तर देवांचाच पक्षपात का करिता ? व आपल्यास आकार कसा ?' वक्रतुंड ह्मणालेः 'मला सर्व सारखे आहेत. आपआपली कर्तव्यें जोपर्यंत सर्व जीव करितांत, तोपर्यंत सर्व ठीक चालते व धर्मही सुयंत्रित चालतो, पण जेव्हा देव आपला धर्म सोडून देऊन उन्मत्त होतात, तेव्हां दैत्यांच्या करवी मी

तपश्चर्या करवितों व त्यास विष्णु, शंकर व ब्रह्मा यांच्याकडून देवविनाशक वर देववितो. नंतर देवांचे सर्व ऐश्वर्य आपलेसे करणारे दैत्य उन्मत्त होऊन आपला धर्म सोडून देऊं लागले, तर देवांच्या हृदयांत शिरून त्यांस दैत्यांची वर्मे सांगतो व त्यांचा नाश करण्यासाठी मी देहधर होतों व दैत्यांचा नाश करितो. याप्रमाणे दोघेही सावध होतात. व सर्व जगताचा गाडा सुयंत्र चालतो;' असे बोलून मत्सरासुराला श्रीगणपतींनी आपले स्वरुप दाखविले व ते पाहण्यासाठी मत्सरास त्यांनी दिव्यचक्षूही दिले. ते अतिविलक्षण, ना सगुण ना निर्गुण, न न्यून न अधिक, न विदेही न सदेही, न मायी न अमायी, देह सगुणरूप, मस्तक निर्गुणरूप, असे अभिनवसुंदर, अतितेजस्वी स्वरुप पाहून तो दैत्यराज विगलितगर्व झाला, त्याच्या अंतःकरणांत भक्तिभावाचा पूर लोटला, हात जोडून त्याने ज्ञानी भक्ताप्रमाणे परमेश्वराची भक्तिपूर्ण स्तुति केली व दर्शन झाल्याबद्दल आपण आपलेच धन्यवाद गाईले. श्रीगणपतिही प्रसन्न झाले. त्याला अखड भक्तिचा व गणेशभक्तांच्या संगतीचा असे दोन वर देऊन आज्ञा केली की, कोणत्याही कार्यारंभी माझे भक्तिपूर्वक पूजन करीत जा व स्वधर्माने जे वागत असतील, त्यांचे संरक्षण कर. जे कोणी लाभाच्या आशेने कर्म करतील व ज्ञान मिळवितील, त्यांचे फल त्या त्या कर्त्यास दे, पण तेथे आसुरभाव प्रकट कर. पण जे निष्काम कर्म करतील किंवा निष्काम ज्ञान संपादन करतील त्या त्या लोकांची तूं सेवा कर आणि त्यास तुझी पीडा होऊं देऊं नको.' 'तथास्तु' असे मत्सर म्हणाला व पुनः गणेशास वंदन करून तो स्वस्थानी गेला. नंतर सर्व प्रकारचे ज्यांचे ताप हरण झाले आहेत, असे देव श्रीगणपतीची स्तुति करते झाले व 'आम्हांस अखंड भक्ति दे' असे मागून व देवाने 'तथास्तु'

झटल्यावर व श्रीगणपति अंतर्धान पावल्यावर आपआपल्या स्थानी रवाना झाले.

## ‘रिद्धिसिद्धिपति’ अवतार व दंभासुरमंथन

एकदां सृष्टिविरचना करीत असतां ‘मी मोठा’ असा ब्रम्ह्यास गर्व झाला, तेव्हां काही विलक्षण प्राणी उत्पन्न होऊन ब्रह्मदेवास ठोक देऊं लागले. नंतर या त्रासांतून मुक्त व्हावे झणून तो गणपतीस शरण गेला व अनेक वर्षें एकाग्रचित्ताने त्याने उत्तम तपश्चर्या केली, गणपति प्रसन्न होऊन त्याला अखंड भक्ति देते झाले व ‘पुत्ररूपाने माझ्या घरीं व्यक्त स्वरूप घ्या म्हणजे लालनपालनादि अनेक सोहाळे करून मी आपली भक्ति करीन’ असा वर ब्रह्मदेवाने मागितला होता, त्यालाही ‘तथास्तु’ म्हणून व ‘पुनः गर्वाविष्ठ होऊं नको’ असे सांगून गणराज अंतर्धान पावले. पुढें ब्रह्मदेवापासून दंभासुर नावाचा राक्षस उत्पन्न झाला व त्याने आपल्या वडिलांस संतोष उत्पन्न होईल अशी तपश्चर्या केली. नंतर मृत्यु टळण्याचे व ऐश्वर्य मिळण्याचे वरप्रदान घेऊन तो कर्म भूमिवर आला. तेथे त्याने आपले राज्य स्थापन करून कर्ममार्गाचा लोप केला. सर्व देवांचा पराभव केला, त्यांस देशोधडीस लाविले आणि त्रैलोक्याचा स्वामी झाला. त्याच्या नाशार्थ गणपतीनीं ब्रह्मदेवाच्या घरी ‘रिद्धिसिद्धिपति’ या नावाने अवतार घेतला. दुसऱ्याच वर्षी या देवेश्वराने दंभासुराला युद्धाचे आवाहन केले. दंभासुर विस्मित झाला व दैत्यगुरुशुक्रास बोलावून त्यास ‘हा रिद्धिसिद्धिपति कोण?’ असे विचारले. शुक्र झणाले: “हे ब्रह्म आहे, सिद्धि म्हणजे सफलता, यशस्विता होय. ही

एक माया आहे. ही शंकरापासून तो स्तंबापर्यंतच्या सर्व जीवांस मोहित करते. बुद्धि ही उजव्या मांडीवर बसणारी माया आहे. हे सर्व चराचर विश्व बुद्धिमय आहे. या बुद्धींत जे मन आहे ते क्षिप्त, मूढ, विक्षिप्त, एकाग्र व निरुद्ध ( व निरोधक ) असे पाच प्रकारचे आहे. बुद्धीचेही तेच प्रकार व अनंत उपप्रकार आहेत; म्हणून बुद्धि एकच असता अनेक प्रकारची दिसते. हिच्याच सामर्थ्याने भक्तियुक्त जीव ब्रह्मप्राप्ति करून घेतो. असो; या दोघींचा स्वामी गणेश्वर आहे. त्याला शरण जा; तरच जगशील. नाहीतर मरशील.'' हा उपदेश ऐकून व लोभ हा सुरांचाही घातक आहे, तेव्हा त्यास टाकून द्यावा ' असा विचार करून तो सिद्धिबुद्धिपतीस शरण गेला व ' स्वधर्माने चालले असता कोणासही भय नाही ' असा वर व दृढभक्तीचा उत्तम वर संपादून तो स्वस्थानी गेला व देवही प्रमुदित होऊन आपापले लोकांस गेले. अवतारकार्य संपवून गणनाथहीं स्वानंदवासी झाले.

## वसिष्ठ आणि विश्वामित्र–विश्वामित्र–याज्ञवल्क्यसंवाद-दिवोदासाची कथा–विश्वामित्र गणपतीभक्त होऊन मुक्त होतो.

सूत :– ऋषीहो ! नंतर मुद्गलांनी वामनावतारांतील बलियज्ञाची, वामनाने व बलीने गणेशदेवाला भक्तिने संतुष्ट केल्याची व बलीस पाताळाचे राज्य व पुढील मन्वंतरांत इंद्राचे राज्य दिल्याची कथा सांगून मत्सराचा नाश करण्याकरिता झालेला वक्रतुंडाचा जन्म भाद्रपद शुद्ध चतुर्थीला माध्यान्ही झाला हे सांगितले. तसेच ऋषीक ऋषींनी वृद्धपणी लग्न करूनही आपल्या पत्नीस सर्व प्रकारचे भोग

दिले, तिला व तिच्या आईला निरनिराळे प्रसाद देऊन तिच्या पोटी महातपस्वी ब्राह्मण व आईच्या पोटी महापराक्रमी धनुर्धर होतील असे सांगितले असताही प्रसादाची अदलाबदल झाल्यामुळे आईच्या पोटी विश्वामित्र व पत्नीच्या पोटी परशुरामाचा पिता जमदग्नी झाले; पुढे विश्वामित्रास वसिष्ठाने कामधेनु दिली नाही ह्मणून तो रानांत वसिष्ठाची गाय घेऊन चालला असतां ब्रह्मतेजाने क्षत्रिय-तेजाचा पराभव केला. ब्रह्मर्षि होण्याकरितां विश्वामित्राने तपश्चर्या किती खडतर केली इत्यादि वृत्तांत सांगितला. पुढे काय सांगितले ते ऐका:- एक दिवस याज्ञवल्क्य ऋषि विश्वामित्राच्या मठांत आले तेव्हा विश्वामित्राने त्यास परम आदराने प्रणिपात करून आपले उग्र तप व त्यांत आलेली आपसिद्धी ह्यांचा वृत्तांत दीनवाणीने सांगितला व प्रार्थना केली की 'मी सर्वमान्य ब्रह्मर्षि कसा होईन ते सांगा.' तेव्हा याज्ञवल्क्य ह्मणाले: 'प्रथम अभिमान सोड. मत्सराचा त्याग कर आणि मी सांगतो ती कथा ऐकून निर्मत्सराने व निरभिमानाने श्रीगणेशाची उपासना कर. पूर्वी एकदा काशीला व विश्वेश्व-राला गर्व झाला की 'आपण एकमेकांस सोडून कोठेही गेलो नाही.' गर्व उत्पन्न झाला ह्मणजे विघ्ने येतात व नंतर पतन होते, हा सामान्य सिद्धांत आहे. असो; एकदा महाभयंकर दुष्काळ पडला. त्यावेळी प्रजेचा अतोनात क्षय होऊन सर्व भूमि त्रस्त होऊन गेली. तेव्हा हा क्षय पाहून दुःखविव्हल झालेला ब्रह्मदेव दिवोदास-नामक राजा मोक्षासाठी तपश्चर्या करीत होता, त्याकडे गेला आणि 'मी प्रसन्न झालो, काशीक्षेत्राचे राज्य तुला देतो' असा न मागताच वर देता झाला. राजाने 'राज्य नको' असे आग्रहाने सांगितले असताही 'तूं राजा झालास ह्मणजे पर्जन्य पडेल, लोकसंग्रह होईल,

तूं अवश्य जा आणि राज्य घे ' अशी आज्ञा केली ह्मणून व राजास लोकांची दया आली ह्मणून, दिवोदास ' मी शंकराची पूजा करीत जाईन ' असे ब्रह्मदेवास सांगून काशीच्या राज्यावर आरूढ झाला. इतक्यात ब्रह्मदेवाने शंकराला मंदरपर्वतावर मरीची ऋषि तप करीत होता, त्याला वर देण्याकरिता ह्मणून नेले आणि ' काशीस जाऊं नका, अनावृष्टि होऊं नये, ह्मणून मी दिवोदासाला राज्य दिले आहे, कांही वर्षे मंदरास रहा ' असे हात जोडून सांगून त्यांस मंदरावर राहविले. पण काशीचा वियोग शंकराला सहन होईना. तेव्हा अनावृष्टीचे विघ्न आले आहे, ते घालविण्यासाठी त्याने व शंकरप्राप्तीसाठी काशीने गणेशाची उपासना केली इकडे दिवोदास राज्य करूं लागला. तेव्हा यथाकाल पर्जन्य पडून जिकडे तिकडे सुपीक झाले व प्रजेस मोठा आनंद होऊन त्या स्वधर्माने वागूं लागल्या. पापाचा शिरकाव कोठेही नाही, हे पाहून दिवोदास आपले स्वर्गपद घेणार की काय अशी देवांस भीति पडली व पंचमहाभूतांवरील मुख्य देवतांनी पृथ्वीवरील आपआपली कर्मे करण्याचे नाकारिले. दिवोदास पुण्यवान राजा ! त्याने सर्व देवतांची कामे आपण चालविली. तेव्हा देवांनी त्याजवळ जाऊन आपआपली कर्मे मागून घेतली. इकडे शंकरांनी तपश्चर्या केली. ती पाहून गणेश प्रसन्न झाले व गुणेशनामक तेजस्वी व सुंदर ब्राह्मण उत्पन्न करून ' दिवोदासाला मोह पाड, तो गर्वयुक्त झाला आहे आणि काशीचे राज्य शंकरास दे ' अशी आज्ञा केली. हा गुणेश ह्मणजे ढुंढी होय. तसेच, गणपतीने शिवप्रियार्थ व काशिच्या तपाचे सार्थक करण्यासाठी विष्णूला बौद्धरूप धरून लोकांस धर्मभ्रष्ट करण्यास पाठविले. असो; ढुंढीचे सौंदर्य, तेज व सात्विकता पाहून दिवोदासाचा गर्व नाहीसा झाला. पुढे ढुंढीने त्याला ब्रह्मज्ञानाचा उपदेश

केला; व दिवोदास मुक्तही झाला. अर्थातच शंकरास काशी मिळाली व धर्मभ्रष्ट झालेले लोक पुनः स्वधर्मात आले.' याप्रमाणे याज्ञवल्क्यांनीं सांगून विश्वामित्राला अहंकार सोडण्याचा उपाय सांगितला तो हा– 'माझे तप कसले? माझे सामर्थ्य कसले? मी देहधारी, पराधीन आहे. देवाची कृपा झाली तर मला यश मिळेल.' अशी मनोवृत्ति ठेवली ह्मणजे अहंकार जातो. मत्सर सोडून गणेशभक्ति करण्याचाही उपदेश त्या ऋषीने केला. 'सर्वांपेक्षा मी कमी योग्यतेचा आहे असे मानून परमेश्वर भजन केले ह्मणजे मत्सर जातो' हे व गणेशमाहात्म्य सांगून विश्वामित्राची खातरी केली की, गणेश हाच देवदेवेश्वर, सर्व तत्त्वांचा, सर्वभूतांचा व सर्व देवांचा आधार आहे. सर्व तत्त्वे नष्ट झाली, तरी गणेशदेवाच्या आधाराने सर्व विश्व तसेच राहील. याचप्रमाणे सर्वभूते व सर्व देव नाहीसे झाले तरी एका गणेशदेवाच्या आधारावर सर्व विश्व जिवंत राहील, यांत संशय नाही. सर्वांचा विशेष नायक म्हणून त्यास विनायक म्हणतात. हे विनायकमाहात्म्य ऐकून विश्वामित्राने भक्तिपुरःसर गणेशभक्ति केली व तो ब्रह्मर्षिपद पावला. विश्वामित्राने गजाननापाशी मागणे मागितले की, 'मला अखंड भक्ति आणि गणेशभक्तांचा सहवास असावा.' 'तथास्तु' ह्मणून गणनाथ अंतर्धान पावले व विश्वामित्र परमगणेशभक्त होऊन स्वानंदसुखाचा अनुभव घेता झाला.

—०—